

# वाघाचा बछडा

ओरिसाची लोककथा

लेखिका: जोॲना ट्रॉटन



फार फार वर्षांपूर्वी वाघ आपले अन्न शिजवून खात असे. एके दिवशी त्याच्या चुलीची आग विझून गेली. त्यामुळे वाघाला आग आणण्यासाठी गावात जावे लागले.



वाघाला बघून गावातील लोक घाबरले. त्यांनी आपल्या घरांची दारे-खिडक्या बंद केली.

वाघ पुन्हा जंगलात परतला. तो त्याच्या बहिणीकडे गेला. तिला एक बछडा होता.

“गावात जा आणि माझ्यासाठी आग आण,” वाघ त्याच्या भाच्याला म्हणाला. “तू खूप लहान आहेस. त्यामुळे लोक तुला घाबरणार नाहीत.”





बछडा गावाकडे चालू लागला. पण वाटेत तो....





....माकडांशी खेळला....पाण्यात डुंबला....

....झाडांवर चढला. मग गावात पोहोचेपर्यंत आपल्या मामाने काय आणायला सांगितले होते, हे तो विसरला.







“माझ्या मामासाठी एक वस्तू आणायला आलोय मी गावात,” बछडा म्हणाला. “पण ती वस्तू कोणती, हेच मला आठवत नाहीये.”

“ताजं दूध आणायला सांगितलं होतं का?” आजीने विचारले.

बछड्याने पेल्यातील ताजे दूध पिऊन टाकले.

दूध संपल्यावर तो म्हणाला, “नाही, मला वाटतं, हे नाही आणायला सांगितलं.’



“माझ्या मामाने एक वस्तू आणायला सांगितलीय मला,” बछडा म्हणाला. “पण कोणती वस्तू, हे मला आठवत नाहीये.”

“चविष्ट मासे सांगितलेत का?” तरुण मुलाने विचारले.

बछड्याने सगळे चविष्ट मासे खाऊन टाकले.

“नाही, मासे सांगितले नसावेत,” तो म्हणाला.



“मी मामासाठी काही वस्तू आणायला आलोय,” बछडा म्हणाला. “पण कोणती वस्तू हेच मी विसरलोय.”

“मऊमऊ उशी आणायला सांगितलीय का?” छोट्या मुलीने विचारले.

बछडा मऊमऊ उशीवर डोके टेकून लोळू लागला. “नाही, मला नाही वाटत उशी आणायला सांगितलीय,” तो म्हणाला.


“मी मामासाठी एक वस्तू आणायला आलोय,” बछडा म्हणाला. “पण कोणती वस्तू, हेच आठवत नाहीये मला.”
“केसांसाठी कंगवा तर नाही आणायला सांगितला?” आईने विचारले.
मग आईने बछड्याच्या अंगावरचे केस कंगव्याने विंचरले.
“नाही, मला नाही वाटत कंगवा सांगितला,” तो म्हणाला.



वाघ दिवसभर आपल्या भाच्याची वाट बघत होता. सूर्यास्त झाला आणि तारे चमकू लागले तेव्हा तो गावात गेला.



बछडा खूप थकला होता. त्याला एका घरात आग दिसली. त्याच्याजवळ जाऊन तो झोपला.

वाघाने घराच्या खिडकीतून पाहिले. त्याचा भाचा आरामात झोपला होता.
“तू ताजं दूध प्यालास.
“तू चविष्ट मासे खाल्लेस.
“तू मऊमऊ उशीवर लोळलास.
“कुणीतरी तुझे केस कंगव्याने विंचरले.
“आणि आता तू आगीची ऊब घेत झोपलास.
“बछड्या, तू आता वाघ राहिला नाहीस....



“तू आता मांजर झालास!”



मग मांजराला
जाग आली.
मामाने काय
आणायला

सांगितले होते, ते त्याला आठवले. आग! मग एक जांभई देऊन तो परत झोपी गेला.

वाघ जंगलात परतला. तेव्हापासून
वाघाकडे आग नाही. ते अन्न कच्चेच खातात.

वाघाचा बछडा मांजर बनून गावातच राहू लागला.
तेव्हापासून मांजरी नेहमी माणसांसोबत राहात आहेत.

समाप्त